आदिवासी विकास विभागांतर्गत चालविण्यात येणाऱ्या अनुदानित आश्रमशाळांमध्ये नियुक्त केलेल्या शिक्षण सेवकांच्या मानधनात वाढ करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- अआशा.२०२३/प्र.क्र.५१/का.११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २२ जुलै, २०२४

**वाचा:-** १. शालेय शिक्षण विभाग शासन निर्णय पीआरई.२००२/(३३९५)/प्राशि-१, दिनांक २७.०२.२००३
२. शालेय शिक्षण विभाग शासन निर्णय क्र. पीआरई.२००८/(३१३/०८)/ प्राशि-१, दि.१७.०९.२०११
३. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र. अआशा.२०११/प्र.क्र.४१२/का.११, दि.२०.०७.२०१२
४. शालेय शिक्षण विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण.२०२०/प्र.क्र.२६०/टिएनटि-१, दि. ०७.०२.२०२३

**प्रस्तावना-:**

शालेय शिक्षण विभागाने दिनांक २७.०२.२००३ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यासाठी सुधारीत प्राथमिक शिक्षण सेवक योजना कार्यान्वित करण्यात आली. याच धर्तीवर आदिवासी विकास विभागामार्फत चालविण्यात येणाऱ्या आश्रमशाळेत सुध्दा शिक्षण सेवक योजना लागू करण्यात करण्यात आली असून शालेय शिक्षण विभागाने शिक्षण सेवकांच्या मानधनात वाढ केल्यानंतर आदिवासी विकास विभागाकडून आदिवासी विकास विभागामार्फत चालविण्यात येणाऱ्या आश्रमशाळेतील शिक्षण सेवकांच्या मानधनात वाढ करण्यात येते.

आदिवासी विकास विभागामार्फत चालविण्यात येणाऱ्या आश्रमशाळेमधील शिक्षण सेवकांचे मानधन व शालेय शिक्षण विभागांतर्गत असणाऱ्या शिक्षण सेवकांचे असणारे मानधन यामध्ये समानता रहावी तसेच दरम्यानच्या कालावधीत वाढलेली महागाई तसेच राज्य स्थानिक स्वराज्य संस्था तसेच अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक शाळेतील शिक्षकांना ७ व्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू केली आहे. तथापि शिक्षण सेवकांच्या मानधनात सन २०१२ पासून वाढ करण्यात आलेली नाही. मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी रिट याचिका क्रमांक १३६७/२०२२ मध्ये दिनांक ३०.०६.२०२२ रोजी, शिक्षण सेवकांना देण्यात येणारे मानधन कमीत कमी कोणत्याही प्रकारच्या उद्योगातील वर्ग-४ च्या कर्मचाऱ्यास देय किमान वेतनाएवढे सुधारीत करण्यात यावे. मानधनाचे निश्चित दर चार वर्षातून किमान एकदा सुधारीत करण्यात यावे, तसेच शिक्षण सेवकांना रुपये १५०००/ ते रुपये २०,०००/- दरम्यान मानधन अदा करण्यात यावे, असे आदेश दिले आहेत.

२. शालेय शिक्षण विभागाने दिनांक ०७.०२.२०२३ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व कनिष्ठ महाविद्यालय आणि अध्यापक विद्यालयातील शिक्षण सेवकांच्या मानधनात वाढ करण्याचा निर्णय घेतला आहे. त्याच धर्तीवर आदिवासी विकास विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थामार्फत चालविण्यात येणाऱ्या एकूण ५५६ अनुदानित आश्रमशााळांतील एकूण ३३४ शिक्षण सेवकांच्या मानधनात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-:**

आदिवासी विकास विभागातील स्वंयसेवी संस्थामार्फत चालविण्यात येणाऱ्या अनुदानित आश्रमशाळातील शिक्षण सेवकांच्या मानधनात वाढ करण्याबाबत शालेय शिक्षण विभागाच्या दिनांक ०७.०२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयाच्या धर्तीवर खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे-

| अ.क्र. | पदसंवर्ग | पूर्वी देण्यात येणारे मानधन | सुधारीत मानधन |
|---|---|---|---|
| १ | प्राथमिक शिक्षण सेवक | ६,०००/- | १६,०००/- |
| २ | माध्यमिक शिक्षण सेवक | ८,०००/- | १८,०००/- |
| ३ | उच्च माध्यमिक शिक्षण सेवक | ९,०००/- | २०,०००/- |

१) शिक्षण सेवकांच्या मानधनातील वाढ ही दिनांक ०१ जानेवारी, २०२३ पासून लागू करण्यात येत आहे.

२) सध्या शिक्षण सेवकांच्या विनिर्दिष्ट केलेल्या कालावधीत कोणताही बदल करण्यात येणार नाही.

३. सदरहू शासन निर्णय मा. मंत्रिमंडळाने दिनांक ०५.०७.२०२४ रोजीच्या बैठकीमध्ये दिलेल्या मंजूरी अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. याकरीता होणारा खर्च मागणी क्रमांक टि-५ मुख्य लेखाशिर्ष २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण ०२, अनुसूचित जमातीचे कल्याण ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) (२६) स्वयंसेवी संस्थांना मुलोद्योगोत्तर आश्रमशाळा सुरु करणे व त्यांचे परिरक्षण करणे यासाठी सहायक अनुदान (२२२५ १६०६) ३६, सहाय्यक अनुदान (वेतन), योजनांतर्गत या खाली सन २०२४-२५ या वर्षी मंजूर केलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेताक २०२४०७२२१५५७५८४०२४ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने.

PRAVIN
GORAKSHANATH SATHE

Digitally signed by PRAVIN GORAKSHANATH SATHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=8aeae114bc10bc084ffcdf2ae0c667ca6c3eca844c7809bb00f184ed1dc997ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7D0E975C83DBBE2A19FD387F2130D87449EAD27B920A608BF243707CB95AAAA3, cn=PRAVIN GORAKSHANATH SATHE
Date: 2024.07.22 16:09:04 +05'30'

**( प्रविण गो. साठे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०००३२.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
४. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

७. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ, सचिवालय, मुंबई.
८. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
९. मा. मंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१०. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
११. मा. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१२. मा. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
१४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/ नाशिक/नागपूर/ अमरावती.
१५. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१६. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर.
१८. शिक्षण संचालक (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य.
१९. सर्व विभागीय उपसंचालक.
२०. सर्व शिक्षणाधिकारी.
२१. कार्यासन-११ संग्रहार्थ.